**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१६/प्र.क्र.२०२/एसडी.-६.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ०९ जानेवारी, २०१७

वाचा : १. प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम अंमलबजावणी शासन निर्णय दि. २२/०६/२०१५.
२. सरल प्रणाली शासन निर्णय दि. ०३/०७/२०१५.
३. वाचन प्रेरणा दिन साजरा करणेबाबत शासन निर्णय दि. ०७/१०/२०१५.
४. स्वच्छ विद्यालय स्वच्छ महाराष्ट्र कार्यक्रम शासन निर्णय दि. ०७/१०/२०१५.
५. गुणवत्ता वाढ व गळती कमी करण्याबाबत शासन परिपत्रक दि.२८/१०/२०१५.
६. समृद्ध शाळा शासन परिपत्रक दिनांक २३/०३/२०१६.
७. शाळांची मानक व मूल्यमापनाकरिता शाळा सिद्धी शासन निर्णय दि. ३०/०३/२०१६.
८. आंतरराष्ट्रीय शाळा शासन निर्णय दि. १४/१०/२०१६
९. विद्या प्राधिकरण पुनर्रचना शासन निर्णय दि. १७/१०/२०१६.
१०. KRA शासन परिपत्रक दि.०३/११/२०१६.
११. स्थलांतरणा बाबत सर्व शिक्षा अभियान परिपत्रक दिनांक ०१/१०/२०१५
१२. स्थलांतरणा बाबत शासन परिपत्रक दि. ०३/११/२०१६.
१३. गणित विषयाबाबत शासन परिपत्रक दि. १९/११/२०१६.
१४. संकेतस्थळावरील इ-साहित्याचा उपयोग शासन परिपत्रक दि. ०६/१२/२०१६.

**शासन परिपत्रक :-**

राज्याने दिनांक २२ जून २०१५ पासून प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमास सुरुवात केली आहे. यांस शिक्षकांचा खूप चांगला प्रतिसाद मिळाला आणि तो यशस्वीपणे होऊ लागला आहे. या कार्यक्रमात प्रगत शाळेची संकल्पना समोर आणली आणि ती देखील लोकांना आवडली.ती संकल्पना आता पूर्ण राज्यामध्ये रुजू होत असल्यामुळे या वर्षीच्या Key Result Area मध्ये मा. मुख्यमंत्री महोदयांना हे सांगितले गेले की, प्राथमिक शाळांपैकी ५० टक्के, उच्च प्राथमिक शाळांपैकी २५ टक्के आणि माध्यमिक शाळांपैकी २० टक्के शाळा प्रगत करण्यात येतील. मा. मुख्यमंत्री महोदयांनी डिसेंबर, २०१६ च्या पहिल्या आठवडयात की रिझल्ट एरीया (Key Result Area) चा आढावा घेतला तेव्हा त्यांना निदर्शनास आले की १५,००० प्राथमिक शाळा, ४,००० उच्च प्राथमिक शाळा प्रगत झाल्या आहेत. प्राथमिक शाळांची प्रगती फार कमी दिसली कारण ५० टक्के म्हणजे ३३,००० शाळा प्रगत करणे अपेक्षित आहे. त्यामुळे मा.मुख्यमंत्री महोदयांनी याची गती वाढविण्याची सूचना केली आहे. म्हणून आता प्रगत शैक्षणिक महाराष्ट्राऐवजी **जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम** घेण्याचे ठरले आहे.

मागील वर्षाच्या अनुभवाच्या आधारे असे दिसून येते की, मुख्यत्वे शिक्षकांनी काम केले आहे. पर्यवेक्षीय अधिकाऱ्यांपैकी मोजक्या जणांनी काम केले. **जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमामध्ये** पर्यवेक्षीय अधिकारी आणि शासन शिक्षकांच्या मदतीला धावून येणे अपेक्षित आहे. **जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमाचे** घटक खालीलप्रमाणे राहतील.

१. **प्रगत शाळांना भेटी :-**

शिक्षकांनी कुमठे बीट, तादाळी बीट, मिरज तालुका, निफाड बीट अशा प्रगत बीट आणि तालुक्यातील प्रगत शाळांना भेट दिल्यामुळे शिक्षकांना त्यांच्या शाळा प्रगत करण्यास मदत मिळाली, असे सर्व जिल्हयांच्या आढाव्यामध्ये दिसून आले. परंतु असेही दिसून आले आहे की, सर्व शिक्षकांनी प्रगत शाळांना भेटी दिलेल्या नाहीत. प्रत्येक जिल्हयामध्ये ठिकठिकाणी शाळा प्रगत झालेल्या आहेत. त्यामुळे सर्वांनी आता कुमठे बीट, तादाळी बीट, मिरज तालुका, निफाड बीट येथे जाण्याची गरज नाही. तरीसुध्दा मुळचे प्रगत झालेले बीट बघणे केव्हाही चांगले राहील. त्यामुळे **जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम** अंतर्गत राज्यातील सर्व शिक्षकांनी त्याच तालुक्यातील, त्याच केंद्राच्या, त्याच जिल्हयाच्या किमान काही प्रगत शाळा पहाव्यात. हा एक कार्यक्रम सर्व जिल्हयांनी नियोजनपूर्वक राबवावा आणि पुढील एक महिन्याच्या आत हा कार्यक्रम पूर्ण करावा. जेणेकरुन शिक्षकांना त्यांची शाळा प्रगत करण्याची दिशा मिळू शकेल.

२. **राज्यातील प्रत्येक वर्ग डिजीटल करणे :-**

२.१ राज्यामध्ये डिजीटल शाळेची चळवळ उभी राहिली आहे. मागील प्रक्रिया अहवालातील माहितीनुसार सुमारे २५,००० शाळा डिजीटल झाल्या आहेत. या शाळा डिजीटल करण्यासाठी प्रत्येक शाळेनी रु.७०,००० ते रु.१,००,००० पर्यंत खर्च केले आहेत. आता डिजीटल शाळांबाबत नवीन विचार समोर येत आहे. त्यात शाळा डिजीटल करण्यासाठी लागणारा खर्च हा स्वस्त झाला आहे. यामुळे प्रत्येक शाळाच नव्हे तर प्रत्येक वर्ग डिजीटल करणे शक्य झाले आहे, कारण की साहित्याच्या किमती कमी झाल्या आहेत. डिजीटल शाळा म्हणजे काय? याचे बरेच टप्पे असू शकतात. पण **जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र** कार्यक्रम राबविण्यासाठी शिक्षकांनी तंत्रस्नेही (Tech Savvy) होण्यापूर्वी व शाळांकडे निधी उपलब्ध नसल्यावरसुध्दा १०० टक्के शाळांमधील १०० टक्के वर्ग डिजीटल करणे आवश्यक आहे. वर्ग डिजीटल प्रत्येक मुलाच्या हातात एक टॅबलेट तर प्रत्येक वर्गात एक इंटरेक्टीव्ह बोर्ड असणे ही शाळा डिझिटल करण्याची सर्वोत्कृष्ठ युक्ती आहे. परंतू, वर्तमान परिस्थितीत प्रत्येक वर्गासाठी शाळेने लोकसभागातून तसेच अन्य माध्यमातूनमदत मिळवून प्रत्येक वर्गात ३२ इंची किंवा त्यापेक्षा मोठा टिव्ही, तसेच मिरा कास्ट डिव्हाईस किंवा त्यासारखेच बाजारात उपलब्ध असलेले इतर डिव्हाईस ज्यामुळे Android Computer Stick टिव्हीला जोडता येते, एक Android Computer Stick किंवा एक टॅबलेट घ्यावयाची आवश्यकता आहे. Android Computer Stick नसेल तरीसुध्दा शिक्षक स्वत:चा मोबाईल वापरुन मोठया टिव्हीमध्ये मोठया आवाजात विद्यार्थ्यांना विविध साहित्य दाखवू शकतो. आपल्या शाळांमधील अधिकांश वर्ग लहान असल्यामुळे ३२ इंची टिव्हीमध्ये सर्व शैक्षणिक आज्ञावली व सादरीकरण (प्रेझेंटेशन) दाखविणे शक्य आहे. हे जर केले तर रु.१२,००० चा टिव्ही आणि रु. १,५०० चा मिरा कास्ट डिव्हाईस आणि चांगले रॅम आणि मेमरी असलेले Android Computer Stick किंवा टॅबलेट असे सर्व मिळून रु. २०,००० च्या आत सर्व खर्च भागविणे शक्य आहे. अशा रु.२०,००० च्या

पटीत खर्च करुन राज्यातील सर्व शाळांमधील सर्व वर्ग मार्च २०१७ अखेर डिजीटल करुन घेण्यात यावेत. प्रत्येक वर्ग डिजीटल करण्याचे लाभ मुद्दा क्र.४ मध्ये विषद केले आहेत.

२.२ पष्टेपाडा येथील शाळेला मा. सचिव, मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांच्या समवेत भेट दिली असता १५,००० रुपयात अशा प्रकारचे प्रोजेक्टर मिळते. ज्याने कोणताही बोर्ड इंटरएक्टिव्ह बोर्ड होऊ शकतो. इंटरएक्टिव्ह बोर्डमुळे वर्ग अधिक ज्ञानरचनावादी होतो. तेव्हा आत्मविश्वासी शिक्षकांनी टी.व्ही. ऐवजी इंटरॲक्टीव्ह प्रोजेक्टर घ्यावा. तसेच, ज्या शाळांना विजेची समस्या असेल त्यांनी रुपये १५,००० मध्ये सोलर बॅटरी घ्यावी. याबाबतचे Specification (तपशील) व अधिकची माहिती विद्या प्राधिकरणाच्या संकेतस्थळावर मिळेल.

## ३. १०० टक्के शिक्षकांना तंत्रस्नेही(Tech Savvy)करणे :-

३.१. वर नमूद केल्याप्रमाणे टिव्हीवर आधारित डिजीटल वर्ग केले तर शिक्षकांना तातडीने तंत्रस्नेही(Tech Savvy)होण्याची गरज नाही, परंतु Tech Savvy शिक्षक चळवळ राज्यभर मोठया प्रमाणावर सुरु आहे. राज्यात सुमारे ४८,६११ शिक्षकांनी स्वत:ला Tech Savvy म्हणून घोषित केले आहेत. राज्यात ७.२५ लाख शिक्षक आहेत आणि सर्व शिक्षकांनी Tech Savvy होणे गरजेचे आहे. यासाठी आतापर्यंत www.technoteachers.inया संकेतस्थळावर Tech Savvy म्हणून स्वत:ची नोंद झालेल्या शिक्षकांनी जबाबदारी घ्यावी. यामुळे राज्यातील सर्व शिक्षक Tech Savvy होऊ शकतात.

३.२. तसेही वेगळया पध्दतीने विश्लेषण केले तर प्रत्येक शिक्षक Tech Savvy आहे. कारण की, आज जे Mobile Handset आपण वापरतो तो Mobile Handset चंद्रयान सोडण्याकरिता १९६९ साली वापरण्यात आलेल्या Super Computer पेक्षा जास्त विकसित आहे. आजच्या Mobile Handset मध्ये जेवढे Components वापरले गेले आहेत त्यावेळी तेवढे Components वापरले गेले असते तर त्याची आजची किंमत रु.७ कोटी राहिली असती. आज वापरात असलेलाMobile Handset जरी स्वस्त आणि वापरण्यास सोपा असला तरी तो Super Computerआहे हे सर्वांनी मान्य केले पाहिजे. म्हणून प्रत्येक शिक्षकांना Computer हाताळता येतो हे त्यांनी मान्य करायला पाहिजे. त्या शिक्षकांनी त्यांच्या डोक्यातून ते Tech Savvyनाहीत ही बाब काढून टाकणे गरजेचे आहे. हे पटवून देण्याचे काम राज्यातील सर्व Tech Savvyशिक्षकांच्या माध्यमातून करण्यात यावे. ही प्रक्रियादेखील मार्च २०१७ पर्यंत पूर्ण करण्यात यावी.

## ४. १०० टक्के संकल्पनांवर ई-साहित्य तयार करणे :-

सर्व वर्ग डिजीटल होणार असल्यामुळे प्रत्येक वर्गातील, प्रत्येक विषयातील, प्रत्येक पानावर आधारित ज्या काही संकल्पना आहेत त्यावर किमान ५ व्हिडीओ किंवा ५ प्रेझेंटेशन किंवा गाणी, गोष्टी किंवा आकर्षक लिखित सामुग्री हे अपलोड करण्याचे नियोजन झालेले आहे. यासाठीचे काम विद्या प्राधिकरण, पुणे मार्फत MITRA (Maharashtra In-service Teacher Recourse App)हे ॲप विकसित होत आहे.

हे काम पूर्ण करुन घेण्यात यावे. असे केल्याने शिक्षकांचे काम खूप सोपे होणार आहे आणि बऱ्याचशा गोष्टी Audio Visualने पाहिल्यामुळे मुले झपाटयाने शिकणार आहेत. यालाच आपण **जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम** म्हणणार आहोत.

५. **एक स्टेप या प्लॅटफॉर्मवर नोंदणी करणे :-**

एक स्टेप या शिक्षणासाठी काम करणाऱ्या संस्थेसोबत शासनाची चर्चा झाली. राज्याने WhatsApp च्या माध्यमातून मोठी चळवळ उभी केली आहे. परंतु WhatsApp च्या काही मर्यादा आहेत. २५६ पेक्षा जास्त सदस्य होऊ शकत नाही. आधीचे मेसेज वाचणे अवघड होते. तेच तेच मेसेज वेगवेगळया WhatsApp Group मध्ये परत येतात. राज्यातील शिक्षक, सर्व अधिकारी हे सहभागी झाले की नाही हे पाहणे अवघड होऊन जाते. एक स्टेपमध्ये नोंद केल्यावर राज्यामध्ये सर्वच शिक्षकांना एकाच Group मध्ये सहभागी होता येते, याला संख्येची मर्यादा नाही. संपूर्ण माहिती पुन्हा पाहता येते. त्यामुळे सर्व शिक्षकांची नोंद एक स्टेपमध्ये करण्यात यावी. हे काम Tech Savvy शिक्षकांच्या मदतीने करण्यात यावे.

६. **वर्गातील मुलांचे संकल्पनानिहाय संपादणूकीच्या विश्लेषणासाठी माहिती तंत्रज्ञानाचा उपयोग :-**

६.१. पुढच्या काळामध्ये मुले शाळेत येतात की नाही, मुले शाळेत पटावर आहेत की नाही, हया सर्वांचा पाठपुरावा करण्यासाठी संगणक प्रणालीचा वापर करण्यात येणार आहे. आतापर्यंत मुलांची शैक्षणिक प्रगती फक्त शिक्षक पाहत होते. आता शासनसुध्दा मुले शिकत आहेत की नाही यावर लक्ष केंद्रित करणार. मुलांची शैक्षणिक प्रगती यामध्ये शिक्षक स्वत:देखील त्याचा वर्ग शिकत आहे अथवा नाही हे संगणक प्रणालीवर पाहू शकेल. जेणेकरुन ज्या मुलांना जी संकल्पना येत नाही त्या संकल्पनेकडे लक्ष द्यायचे हे संगणक प्रणालीवरुन त्या शिक्षकांना कळणार आहे.

६.२. याप्रकारचे काम आधी वेल्हे तालुक्यामध्ये ग्यानप्रकाश फाउंडेशनमार्फत करण्यात आलेले आहे. अशाच प्रकारचे काम इतर जिल्हा आणि इतर तालुक्यामध्ये “करायला आवडेल का?” असा प्रश्न विचारला असता पुणे आणि नाशिकमध्ये सर्वांनी सांगितले की असे करायलाच पाहिजे. अमरावतीच्या शिक्षणाधिकाऱ्यांनी तरयासाठी ॲप विकसित करण्याची तयारी दाखविली. दिनांक ३१ डिसेंबर, २०१६ च्या आत अशा प्रकारचा एक ॲप विकसित करुन प्रत्येक शिक्षकाला त्याच्या मोबाईलमध्ये डाऊनलोड करता येईल अशी व्यवस्था करण्यात येत आहे. त्यात वर्गात असलेली सर्व मुले, त्यांचा आधार क्रमांक अथवा सरल क्रमांक दिसेल. त्याच्यासमोर भाषा आणि गणिताच्या पायाभूत आणि संकलित चाचणी १ व २ या प्रत्येक प्रश्नपत्रिकेतील प्रश्नांचे क्रमांक दिसतील व त्या प्रत्येक प्रश्नांचे मुलांनी योग्य उत्तर दिले अथवा अयोग्य हे नमूद करावे लागेल. ते केल्यावर त्याचे विश्लेषण हे रंगीत कोड स्वरुपात आपल्या मोबाईल स्क्रीनवर दिसेल. त्यामध्ये ज्या प्रश्नांची उत्तरे विद्यार्थ्यांने योग्य दिली ते हिरवे आणि ज्या प्रश्नांची उत्तरे विद्यार्थ्यांने अयोग्य दिली ते पिवळा आणि ज्या प्रश्नांचे उत्तर संपूर्ण वर्गाने चुकीचे दिले असेल ते लाल या

रंगात दिसेल. जेणेकरुन शिक्षकांना, केंद्र प्रमुखांना एका क्षणात दृश्य स्वरुपात त्या वर्गाचे विश्लेषण दिसेल. जर संपूर्ण वर्गाला एखाद्या प्रश्नाचे उत्तर जमले नसेल तर ते शिक्षकाला योग्य प्रकारे शिकवता आले नाही ही शक्यता आहे.

७. **सर्व पर्यवेक्षीय यंत्रणेचा शाळा नेतृत्व प्रशिक्षण करणे :-**

७.१. वरील सर्व मुद्दयांमध्ये शिक्षक आणि शाळेतील वर्गाबद्दल बोलण्यात आले आहे. परंतु यासोबतच पर्यवेक्षकीय यंत्रणेचा सुध्दा उल्लेख व्हायला हवा. त्यांना मागील वर्षी Management of Training (MOT)चे प्रशिक्षण देण्यात आले. विविध आढावा सभांमध्ये दिसून येते की या यंत्रणेद्वारे शाळा प्रगत करण्यासाठी फक्त बैठका घेतल्या जात आहेत. वर्गातील शिक्षक आणि विद्यार्थ्यांमधील शिकण्याची आंतरक्रिया बदलण्यासाठी पध्दतशीर काम होताना दिसत नाही. हे सर्व व्हावे यादृष्टीने राज्यातील सर्व पर्यवेक्षकीय यंत्रणेला पुढील दीड ते दोन महिन्यामध्ये नेतृत्व प्रशिक्षण (School Leadership Development Programme) दिलेजाणार आहे. या कार्यक्रमासाठी प्रशिक्षक तयार करुन राज्यातील किमान ५,००० केंद्रप्रमुख, विषय साधन व्यक्ती, विस्तार अधिकारी आणि गट शिक्षणाधिकारी यांना School Leadership Development Programme अंतर्गत नेतृत्व प्रशिक्षण देण्यात यावे. ही जबाबदारी मीपाने पार पाडावी

८. **शाळाबाहय मुलांना शोधून गुणवत्ता वाढवून शाळेत टिकविणे :-**

८.१. शाळाबाहय मुलांसंदर्भात अलिकडच्या काळात आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय आणि राज्यांतर्गत सर्व ठिकाणी पुन्हा नव्याने चर्चा सुरु झाली आहे. यावरुन असे दिसते की सर्वांना आत्मविश्वास आला आहे की, आता जी मुले शाळाबाहय राहिली आहेत. त्यांना नियमित शाळेत दाखल करुन नियमितपणे टिकवून शिकविता येईल.

८.२. अजून एक गोष्ट लक्षात आली की वरवंडी तांडा ता.पैठण जि.औरंगाबाद तसेच शिलेगाव वस्ती ता.गंगापूर जि.औरंगाबाद तसेच धुळे आणि नंदुरबार जिल्हयामध्ये शाळेची गुणवत्ता अतिउत्कृष्ट असली तर अगदी स्थलांतरित होणारी मुलेसुध्दास्थलांतरित होत नाहीत, ते नियमित शाळेत येतात मात्र त्यांचे आई-वडील पोटापाण्याच्या प्रश्नासाठी स्थलांतरित होतात. या शाळांचा अभ्यास केला असता हे सिध्द झाले आहे की शाळेची गुणवत्ता अतिउत्कृष्ट असली तर शाळाबाहय मुले शाळेत येण्यास तयार होतात.

८.३. या परिपत्रकान्वये **जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम** ही संकल्पना देण्यात येत आहे. शाळा प्रगत झाली की शाळाबाहय मुलांचे प्रमाण शुन्यावर येईल. एखाद्या गावामध्ये शाळाबाहय मुले असतील आणि शाळेत येणारी १०० टक्के मुले जरी शिकायला लागली तरी ती शाळा प्रगत शाळा म्हणून सांगितली जाऊ शकत नाही. शाळाबाहय मुले शुन्यावर आणण्यासाठीचा गुणवत्तापूर्व शिक्षक हा सर्वात मोठा मार्ग आहे.

८.४. त्याचप्रमाणे डिसेंबर २०१६ या माहिन्यामध्ये राज्याच्या जनगणनेची तुलना राज्याच्या U-DISEबरोबर करुन वयोगटानुसार किती मुले शाळाबाहय असू शकतात याची जिल्हानिहाय माहिती देण्यात आली आहे. या माहितीचा उपयोग

करुन प्रत्येक जिल्हयाने शाळाबाहय मुलांचा शोध घ्यावा. इयत्ता ८ वी पर्यंत एकूण शाळाबाहय मुले ४.२० लाख आहेत. त्या मुलांचा शोध घेऊन त्या मुलांना पटावर आणावे आणि ज्या शाळांच्याआवारामध्ये जेवढे अधिक शाळाबाहय मुले सापडतील तेवढया जास्त गतीने त्या शाळेने स्वत:ला प्रगत करावे. यामुळे सर्व शाळाबाहय मुले शाळेच्या मुख्य प्रवाहात दाखल होऊन जातील.

८.५. नंदुरबार जिल्हयाचे उदाहरण द्यायचे झाले तर वर्षभर सर्वेक्षण करुनसुध्दा ७०० शाळाबाहय मुले या जिल्हयात शोधली होती. परंतु शाळाबाहय मुले शोधण्याची दृष्टी बदलली तेव्हा १५ दिवसात या जिल्हयात १,४३३ शाळाबाहय मुले सापडली. म्हणून ही ४.२० लाख शाळाबाहय मुले शोधण्यासाठी दृष्टी बदलण्याची गरज आहे. सर्वेक्षणऐवजी शोध घेण्याची गरज आहे. तसेच ती मुले पुन्हा शाळाबाहय होऊ नये यासाठी शाळा लवकरात लवकर प्रगत करण्याची गरज आहे.

**९. स्थलांतरित होणाऱ्या मुलांची सरल प्रणालीमये १०० टक्के नोंद करणे :-**

९.१. स्थलांतरित होणाऱ्या मुलांना शिक्षण हमी पत्रक ( Education Guarantee Card) देण्याचे परिपत्रक २०१५ मध्ये काढण्यात आले आहे. परंतु प्रत्येक शाळेमध्ये Education Guarantee Card दिले जात आहे किंवा नाही हे कळत नव्हते. ते कळावे यासाठी Education Guarantee Card विद्यार्थ्यांना दिल्यावर ते SARAL प्रणालीमध्ये अपलोड करावयाचे आहे.

९.२. त्याचप्रमाणे त्या मुलांना स्थलांतराजवळील ठिकाणच्या शाळेत दाखल करणे गरजेचे आहे.

९.३. या दोन्ही बाबी घडल्यावर शिक्षण विभागाचे प्रधान सचिव, आयुक्त, मा.मंत्री या सर्व जणांना रोजच्या रोज किती शाळांनी Education Guarantee Card नुसार स्थलांतरण झालेल्या जिल्हयातील शाळेत दाखल झाली, याचा जिल्हानिहाय अहवाल SMS द्वारे मिळतो. म्हणून प्रत्येक मुलाची नोंद ही SARAL प्रणालीमध्ये करावी.

९.४. Education Guarantee Card ची माहिती भरण्याचे राहून गेले असल्यास जानेवारी २०१७ मधील सेल्फी हा कार्यक्रम घेण्यात येणारअसल्यामुळे ती मुले गैरहजर दिसतील. त्या गैरहजर विद्यार्थ्यांची Education Guarantee Card ची नोंद नसल्याचे शासनाच्या निदर्शनास येईल.

९.५. न केलेल्या कामाची माहिती अशा पध्दतीने शासनास कळणे ही बाब चांगली नाही. त्यामुळे जेवढी मुले स्थलांतरित होतात त्या सर्वांचे Education Guarantee Card अपलोड करण्याची काळजी घेण्यात यावी.

**१०. बाल रक्षक :-**

१०.१. शाळाबाहय मुलांच्या समस्या विभिन्न स्वरुपाच्या आहेत. ती शाळाबाहय होण्याची कारणेही विविध सांगितली जातात. शाळाबाहय मुलांचा शोध घेऊन त्यांना नियमित शाळेत दाखल करुन नियमितपणे शिकविण्यासाठी त्यांना मदतीची गरज आहे. त्यासाठी याविषयाशी निगडीत मध्ये झपाटयाने काम करणाऱ्या यंत्रणेमधील व्यक्तींची भूमिका महत्वाची ठरणारी आहे. त्यामुळे शासन व्यवस्थेत झपाटण्याने

काम करणाऱ्या व्यक्तींची मदत यामध्ये घेण्यात यावी. प्रत्येक तालुक्यातून किमान दोन आणि आदिवासी बहुल विविध बोलीभाषेच्या क्षेत्रामधील प्रत्येक केंद्रामधून प्रत्येक दोन व्यक्तींची निवड करण्यात यावी.

१०.२. शहरी भागात शाळाबाहय मुलांचा शोध घेण्यात अनेक अडचणी आहेत. त्यांच्या सुरक्षा विषयक व अन्य प्रकारच्या अडचणी आहेत. त्यामुळे शहरी भागात प्रत्येक केंद्रातून किमान ५ व्यक्तींची निवड करताना त्याची या विषयाशी संबंधित Commitment संवेदनशिलता व स्वप्रेरणेने काम करण्याची तयारी असणे आवश्यक आहे.

१०.३. अशा झपाटलेल्या शासन व्यवस्थेतील व्यक्तीची https://www.research.net/r/balrakshak या लिंकवर भरण्यात यावी. अशा व्यक्तींची माहिती वरील लिंकवर भरण्यासाठी पर्यवेक्षीय यंत्रणेने WhatsApp च्या माध्यमातून विविध Group मध्ये चर्चा करुन त्यांना प्रोत्साहित करावे.

**११. शाळा सिध्दी या पोर्टलवर स्वमूल्यमापन** :-

११.१. येत्या एक-दोन वर्षात १०० टक्के शाळा प्रगत होतील. त्या प्रगत पातळीवर टिकून राहावे यासाठी त्या शाळेचा सर्व समावेशक विकास होणे आवश्यक आहे. शाळा सिध्दी या पोर्टलमध्ये शाळेची माहिती भरल्यावर शाळा कोणत्या पातळीपर्यंत विकसित झाली आहे हे कळते.

११.२. यासाठी शासनाने दिनांक-३० मार्च २०१६ रोजी परिपत्रक सुध्दा काढले आहे. येत्या एक महिन्याच्या आत सर्व शाळांना शाळा सिध्दीचा स्वमूल्यमापन फॉर्म भरुन घ्यावा.

११.३. फॉर्म भरल्यावर ज्या शाळा "A"ग्रेडमध्ये दिसतील त्या शाळांचे बहिस्थ मुल्यमापन करुन प्रमाणित करण्यात येणार आहे, याचीही नोंद घेण्यात यावी.

वरील सर्व गोष्टी येत्या २ ते ४ महिन्यामध्ये आपल्याला करावयाच्या आहेत. असे केल्याने मुले झपाटयाने शिकतील. शिक्षकांना कमी मेहनतीने मुलांना शिकविणे शक्य होईल. झपाटयाने शाळा प्रगत होतील. म्हणून या कार्यक्रमाचे नाव **जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम** हे ठेवण्यात आले आहे. या कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करुन १०० टक्के शाळा प्रगत करण्यास सर्वांना यश मिळावे शुभेच्छा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०१०९१२१७२२९५२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.01.09 12:21:36 +05'30'

**( नंद कुमार )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत** :- मा.मंत्री शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

**प्रत :**- माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव
१) आयुक्त (शिक्षण) आयुक्त शिक्षण यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य पुणे
२) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक प्रशिक्षण परिषद, मुंबई
३) संचालक, महाराष्ट्र विद्या प्राधिकरण,पुणे
४) शिक्षण संचालक, (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, पुणे
५) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे,
६) शिक्षण संचालक (अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण), शिक्षण संचालनालय, पुणे,
७) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९) विभागीय शिक्षण उपसंचालक, सर्व विभाग
१०) मुख्याधिकारी सर्व नगरपालिका/ नगरपरिषद
११) प्राचार्य, शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था (सर्व)
१२) शिक्षण निरीक्षक उत्तर/दक्षिण/पश्चिम, बृहन्मुंबई
१३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर) जिल्हा परिषद (सर्व)
१४) शिक्षणाधिकारी/ शिक्षणप्रमुख/प्रशासनाधिकारी, महानगरपालिका (सर्व).